केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत राष्ट्रीय आयुष अभियानाकरीता सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०१९-२० या आर्थिक वर्षामधील प्रलंबित केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५७४ अंतर्गत रु.९८.२० लक्ष व प्रलंबित राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५८३ अंतर्गत रु.१८५.३२ लक्ष असा एकूण रु.२८३.५२ लक्ष इतका निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयुष-३०२०/प्र.क्र.२३/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०२०.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.०४.२०२०.
२) संचालक आयुष, आयुष संचालनालय, मुंबई यांचे क्र.आसंमुं/राआअ/केपुयो/SCSP/२०१९-२०/केंद्र हिस्सा/वितरित/२०२०/आयु-२ , दिनांक ०७.०८.२०२०.
३) संचालक आयुष, आयुष संचालनालय, मुंबई यांचे क्र.आसंमुं/राआअ/केपुयो/SCSP/२०१४-१५/ राज्य हिस्सा/वितरित/२०२०/आयु-२ , दिनांक १०.०८.२०२०.

**प्रस्तावना:-**

भारत सरकारने राष्ट्रीय आयुष अभियान (National AYUSH Mission) ही केंद्र पुरस्कृत योजना सप्टेंबर, २०१४ मध्ये सुरु केलेली आहे. सदर योजनेनुसार देशातील सामान्य जनतेकरीता आयुष आरोग्य सेवा व शिक्षण उपलब्ध करणे, आयुर्वेदीक, होमिओपॅथीक व युनानी औषधांच्या दर्जात वाढ करणे व सातत्यपूर्ण गुणात्मक औषधी वनस्पती पुरवठा करणे इ. घटकांचा समावेश आहे. त्याकरीता सदर योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार संबंधित घटकांसाठी आवश्यक लागणाऱ्या निधीपैकी ६० टक्के हिस्सा केंद्र शासनाने व ४० टक्के हिस्सा राज्य शासनाने उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत राष्ट्रीय आयुष अभियानाकरीता सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०१९-२० या आर्थिक वर्षामधील प्रलंबित केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५७४ अंतर्गत रु.९८.२० लक्ष व प्रलंबित राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५८३ अंतर्गत रु.१८५.३२ लक्ष असा एकूण रु.२८३.५२ लक्ष इतका निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून वितरीत करण्याकरीता पुढील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत राष्ट्रीय आयुष अभियानाकरीता सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) केंद्र हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५७४ अंतर्गत रु.१२८१.२९ लक्ष तसेच राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५८३ अंतर्गत रु.१८५.३२ लक्ष इतका निधी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर निधीपैंकी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अखर्चित निधी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीमधून केंद्र हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५७४ अंतर्गत रु.९८.२० लक्ष तसेच राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५८३ अंतर्गत रु.१८५.३२ लक्ष असा एकूण रु.२८३.५२ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | तपशील | अर्थसंकल्पिय तरतुद सन २०२०-२१ | वितरीत रक्कम |
|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१) (०१) राष्ट्रीय आयुष अभियान (केंद्र हिस्सा ६० %) २२१०G५७४ अतंर्गत राष्ट्रीय आयुष अभियान केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर | १२८१.२९ | ९८.२० |
| २ | मागणी क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१) (०२) राष्ट्रीय आयुष अभियान (राज्य हिस्सा ४० %) २२१०G५८३ अतंर्गत राष्ट्रीय आयुष अभियान केंद्र पुरस्कृत योजना (राज्याचा हिस्सा), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर | १८५.३२ | १८५.३२ |

२. उपरोक्त अनुदानासाठी सदर निधी राज्य आयुष सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे “नियंत्रक अधिकारी” अधिकारी असतील.

३. सदर केंद्र हिश्श्यामधील खर्च मागणी क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१) (०१) राष्ट्रीय आयुष अभियान (केंद्र हिस्सा ६० %) २२१०G५७४ अतंर्गत राष्ट्रीय आयुष अभियान केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) राज्य हिश्श्यामधील खर्च मागणी क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१) (०२) राष्ट्रीय आयुष अभियान (राज्य हिस्सा ४० %) २२१०G५८३ अतंर्गत राष्ट्रीय आयुष अभियान केंद्र पुरस्कृत योजना (राज्याचा हिस्सा), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) परिशिष्ट -अ मधील सारणीतील स्तंभ क्र.३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. वित्त विभागाच्या दिनांक १ एप्रिल, २०१९ व दिनांक ०८ जुलै, २०१९ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे प्रमाणपत्र संचालक आयुष, आयुष संचालनालय, मुंबई यांनी सादर केले आहे.

६. सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आयुष सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

७. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आयुष सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१/०४/२०१९ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आयुष सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

८. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अर्थसंकल्प शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४४-एसजेएसए, दिनांक २४.०९.२०२० व वित्त विभागाच्या व्यय-१३ कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३८१/२०२०/व्यय १३ , दिनांक २७.१०.२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०९१३१८२२४२१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.12.09 15:04:38 +05'30'

( मिलिंद कुळकर्णी )
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)